राज्य शासनाच्या मोफत गणवेश व लेखन साहित्य वाटप योजनेंतर्गत निधी वितरण (सन २०१७-१८)

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१७/प्र.क्र.१११/एस.डी.३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०१७

वाचा:-

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८/०४/२०१७
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. एसएसए-१२१४/प्र.क्र.५०/एस.डी.३, दि. २८/०६/२०१६

**शासन निर्णय :-**

राज्य शासनाच्या १०३ विकास गटाकरिता इ.१ ली ते ४ थी च्या अनुसूचित जाती / जमातीच्या विद्यार्थ्यांकरिता मोफत गणवेश व लेखनसाहित्य वाटप योजनेंतर्गत खालीलप्रमाणे रु.२७२.०० लक्ष (रूपये दोन कोटी बहात्तर लक्ष फक्त) निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पित तरतूद | वितरित करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, (०१) (०४), जिल्हा परिषद प्राथमिक शाळांमधील अनुसुचित जातीच्या / जमातीच्या विद्यार्थ्यांना विशेष सुविधा (२२०२ ३६५५), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | रु.१८०.०० लक्ष | रु. १४४.०० लक्ष |
| २. | मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१-प्राथमिक शिक्षण, (०१) (०५), १०३ विकास गटांमधील इ.१ ली ते ४ थी पर्यंतच्या विद्यार्थ्यांसाठी मोफत गणवेश व लेखन साहित्यासाठी जिल्हा परिषदांना अनुदाने (२२०२ ३६६४) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" | रु.१६०.००लक्ष | रु. १२८.०० लक्ष |
| | **एकूण** | **रू.३४०.०० लक्ष** | **रु. २७२.०० लक्ष** |

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १८/०४/२०१७ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच, परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ५, ६ व ७ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाहीत.

३. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१८/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. यासाठी शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०२११३६२७३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.06.02 13:38:38 +05'30'

**(डॉ.सुवर्णा खरात)**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
११. शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१२. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती - एस.डी.३